**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत तसेच क्षेत्रिय पातळीवरील गट-अ व गट-ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्या बाबतीत निलंबनाचा आढावा घेण्यास्तव निलंबन आढावा समितीचे गठण.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सकआ २०१२/ प्र.क्र. ४९९/ आस्था-२**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० ऑगस्ट, २०१५

**वाचा :** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र निप्रआ ११११/ प्र.क्र ८६/११-अ, दि.१४/१०/२०११
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र अभियो १३१४/ प्र.क्र ८६/११-अ, दि.३१/१/२०१५

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम ४ मधील पोटनियम ५ च्या खंड (क) च्या परंतुकानुसार शासकीय कर्मचाऱ्यावर फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला असेल तर अशा प्रकरणांमध्ये निलंबित कर्मचाऱ्यांच्या निलंबन आदेशात फेरबदल करण्यापूर्वी वा तो रद्द करण्यापूर्वी शासनाने या प्रयोजनार्थ गठीत केलेल्या निलंबन आढावा समितीची शिफारस प्राप्त करुन घ्यावी, अशी तरतुद विहित करण्यात आली आहे. सदर तरतुदींच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गट-अ व गट-ब मधील कर्मचाऱ्यांसाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली निलंबन आढावा समिती गठित करण्यात आली असून समितीच्या कामकाजाची पध्दत विशद करण्यात आली आहे.

आता अधिकारांचे प्रत्यायोजन करणे व निर्णयप्रक्रियेत सुलभता आणून निर्णय प्रक्रिया गतिमान करण्याच्या शासनाच्या धोरणांच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीऐवजी त्या-त्या प्रशासकीय विभागाच्या अखत्यारीतील राजपत्रित गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांच्या अ.मु.स/ प्र.स./ सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या निलंबन आढावा समितीस प्रत्यायोजित करण्यात आले आहेत. सदर प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारांनुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (खुद्द) व सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय स्तरावरील फौजदारी गुन्हा दाखल झाल्यामुळे निलंबित झालेल्या गट अ व गट ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी खालीलप्रमाणे निलंबन आढावा समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. प्रधान सचिव/ सचिव, सा.न्या. व वि.स.विभाग, मंत्रालय | : | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग | : | सदस्य |
| ३. उप सचिव/ सह सचिव, गृह विभाग, मंत्रालय, | : | सदस्य |
| ४. उप सचिव/ सह सचिव, सा.न्या. व वि.स.विभाग,मंत्रालय | : | सदस्य सचिव |

२. फौजदारी गुन्हा दाखल झाल्यामुळे निलंबित करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या निलंबनाच्या दिनांकापासून एक वर्षानंतर प्रकरणांचा नियतकालिक आढावा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि. १४.१०.२०११ च्या परिच्छेद ५ मधील कार्यपध्दतीचे अवलंब करुन निलंबित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचा आढावा घेण्यात येईल.

३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि. १४.१०.२०११ मधील २(१) अनुसार समितीपुढे विचारार्थ येणाऱ्या प्रस्तावासंदर्भात सर्वसाधारणपणे खालीलप्रमाणे निकष निलंबन आढावा समिती विचारात घेऊन, निलंबन आढावा समिती सकारात्मक विचार करु शकेल.

१. संबंधित अधिकारी यांच्याविरुध्द सक्षम न्यायालयात अभियोग चालविण्यास सक्षम प्राधिकाऱ्यांनी मंजूरी दिलेली असावी.
२. संबंधित अधिकारी यांच्या विरुध्द विभागीय चौकशी सुरु करण्यात येऊन दोषारोपपत्र बजावण्यात आलेले असावे.
३. संबंधित अधिकारी यांचा निलंबन कालावधी १ वर्षाहून अधिक झालेला असावा.

४. निलंबन आढावा समिती उपरोक्त परिच्छेद क्र. ३ मधील बाबी विचारात घेऊन निलंबीत अधिकाऱ्यांच्या प्रकरणाचा आढावा घेईल व असे निलंबन मागे घेण्यास अथवा पुढे चालू ठेवण्यास सक्षम प्राधिकारी यांना शिफारस करेल.

५. लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेल्या व विभागाकडे ९० दिवसांपेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित असलेल्या अभियोग मंजूरीच्या प्रकरणांचा, निलंबित अथवा निलंबनाशिवाय पुन:स्थापना/ नेमणूक करताना अकार्यकारी पदावर नियुक्ती आहे किंवा कसे याची तपासणी करणे, लाचलुचपत/फौजदारी प्रकरणात न्यायालयाने शिक्षा केलेल्या कर्मचाऱ्यांवर कारवाई करणे या बाबींचा आढावा घेऊन संबंधितांना जलद निपटारा करण्याबाबत कार्यवाही करावयाच्या सूचना समिती देईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२११५०७००७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uttam Shivram Lonare

Digitally signed by Uttam Shivram Lonare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivram Lonare
Date: 2015.08.21 15:10:13 +05'30'

**( उ. शि. लोणारे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

आयुक्त, समाजकल्याण पुणे
आयुक्त, अपंगकल्याण पुणे
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
महासंचालक, डॉ.बाजबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
मा. मंत्री, ( सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री, (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
मा. प्रधान सचिव (सा.न्या. व वि.स. ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
सर्व सह सचिव/ उप सचिव / अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, कार्यासन ११-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आस्था २ संगहार्थ